कोविड-१९ परिस्थितीमुळे राज्यात घोषित केलेल्या लॉकडाऊन कालावधीमध्ये तालुका, जिल्हाधिकारी / महानगरपालिका व विभागीय आयुक्त स्तरावर लोकशाही दिनाचे आयोजन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-१५२०/प्र.क्र.२४/लोदिकक्ष**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०००३२
दिनांक : २३ नोव्हेंबर, २०२०

संदर्भ : शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रसुधा-२०११/प्र.क्र.१८९/ ११/१८-अ, दि.२६.०९.२०१२

प्रस्तावना :-

शासन परिपत्रक दिनांक २६ सप्टेंबर २०१२ अन्वये सर्व स्तरावरील लोकशाही दिन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत एकत्रित मार्गदर्शक तत्वे विहीत करण्यात आली आहेत. त्यानुसार तालुका स्तर, जिल्हाधिकारी स्तर/महानगरपालिका स्तर, विभागीय आयुक्त स्तर व मंत्रालय असे चार स्तर लोकशाही दिन आयोजनासाठी निश्चित करण्यात आले आहेत. तालुका स्तरावर प्रत्येक महिन्याचा तिसरा सोमवार, जिल्हाधिकारी/महानगरपालिका स्तरावर प्रत्येक महिन्याचा पहिला सोमवार, विभागीय आयुक्त स्तरावर प्रत्येक महिन्याचा दुसरा सोमवार, तर मंत्रालय स्तरावर दर महिन्याच्या पहिल्या सोमवारी लोकशाही दिनाचे आयोजन करण्याबाबत उक्त शासन परिपत्रकान्वये निर्देश देण्यात आले आहेत. तसेच निवडणूक आचारसंहितेच्या काळात व विधानमंडळ अधिवेशन काळात लोकशाही दिन आयोजित करण्यात येणार नाही, असेही निर्देश सदर परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत. सदरहू परिपत्रकातील निर्देशानुसार त्या-त्या स्तरावर लोकशाही दिनाचे आयोजन करण्यात येते.

२. माहे मार्च २०२० पासून उद्भवलेल्या कोविड-१९ या साथरोगाच्या आपत्तीमुळे सदर रोगाचा संसर्ग न होण्याच्या दृष्टीकोनातून जनहितार्थ Social Distancing चे कडक पालन करण्याबाबत शासनाने सूचना दिल्या होत्या. यास्तव लॉकडाऊनच्या कालावधीत लोकशाही दिनाचे आयोजन करण्यात आले नाही. लॉकडाऊन टप्प्या-टप्प्याने शिथील करण्यात आल्याने लोकशाही दिनाचे आयोजन करावे किंवा कसे याबाबत क्षेत्रीय स्तरावरुन (जिल्हाधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय) शासनास विचारणा होत असल्याने प्राप्त परिस्थितीत लोकशाही दिनाचे आयोजन दूरचित्रवाणी परिषदेद्वारे (Video Conferencing) करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :-

शासन परिपत्रक दि.२६.०९.२०१२ अन्वये तालुका स्तरावरील लोकशाही दिनासाठी तहसिलदार, जिल्हाधिकारी/महानगरपालिका स्तरावरील लोकशाही दिनासाठी जिल्हाधिकारी/ महानगर पालिका आयुक्त, विभागीय स्तरावरील लोकशाही दिनासाठी विभागीय आयुक्त यांना अध्यक्ष घोषित करण्यात आले आहे. यास्तव प्राप्त परिस्थितीमध्ये लोकशाही दिनाचे आयोजन परिस्थितीनुरुप करण्यासाठी ते सक्षम आहेत. तथापि, लॉकडाऊन टप्प्या-टप्प्याने शिथील करण्यात येत असल्याने लोकशाही दिनाचे आयोजन परिस्थितीनुरुप व शक्य असल्यास दूरचित्रवाणी परिषदेद्वारे (Video Conferencing) अथवा अर्जदारांच्या संमतीने शक्य असल्यास Google Meet, Zoom App इ. ॲपचा वापर करुन करण्यात यावे. तसेच, ज्या ठिकाणी कोविड-१९ चा प्रादुर्भाव कमी व अर्जदारांना कार्यालयात बोलाविणे शक्य असेल त्या ठिकाणी सार्वजनिक आरोग्याच्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन केल्यानंतरच अर्जदारांना छोट्या संख्येच्या गटात समक्ष बोलावून लोकशाही दिनाचे आयोजन करण्यात यावे.

२. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०११२३१४४४१४२००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahendra B. Warbhuvan

Digitally signed by Mahendra B. Warbhuvan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1820e76326f7ffc0eb5440aa1d116e31ab33d1650bef97c28b4e7e3f94dc8fac, serialNumber=a1e98b26dbd46ae8be89ba8fc81904d8ed71bc2c1d914fb15f2de79f35a7b4d8, cn=Mahendra B. Warbhuvan
Date: 2020.11.23 14:48:23 +05'30'

**( महेंद्र ब. वारभुवन )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती),
२. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
४. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव(५ प्रती), मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५. मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
७. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ पोलीस महानिरीक्षक
१०.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
११.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१२.सचिव, निवडणूक आयोग, मुंबई,
१३.सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१४.सर्व मनपा आयुक्त/पोलीस आयुक्त/सर्व पोलीस अधीक्षक,
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१६.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१७.प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,
१८. सर्व जिल्हा माहिती अधिकारी
१९.सर्व तहसिलदार
२०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (यांना प्रसिध्दीसाठी)
२१.ग्रंथालय विधानमंडळ सचिवालय (५ प्रती)
२२.निवड नस्ती/लोकशाही दिन कक्ष, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई४०००३२.